**नमो शेतकरी महासन्मान निधी योजना सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीद्वारे राबविण्यासाठी स्वतंत्र बँक खाते उघडण्यास परवानगी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पीएफएम-२०२३/प्र.क्र.७२/२-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २८ जुलै, २०२३.

**<u>वाचा:</u>** १) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक: पीएफएम-२०१७/ प्र.क्र.४५/१७/ २-अे, दि.२७ सप्टेंबर, २०१७.
२) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.गणना/नमो शेतकरी महासन्मान निधी नस्ती/१८११२/२०२३, दि.३१.०५.२०२३.
३) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक: किसनि-२०२३/प्र.क्र.४२/११-अे, दि.१५.०६.२०२३.

**<u>प्रस्तावना:-</u>**

सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनामध्ये मा.उपमुख्यमंत्री तथा वित्तमंत्री यांनी केलेल्या अर्थसंकल्पीय भाषणामध्ये केलेल्या घोषणेस अनुसरुन, अन्नदाता बळीराजाच्या उत्पन्नवाढीसाठी केंद्र शासनाच्या प्रधानमंत्री कृषि सन्मान निधी योजनेत देण्यात येणाऱ्या प्रतिवर्षी प्रति शेतकरी रुपये ६,०००/- या अनुदानामध्ये राज्य शासनाची आणखी रुपये ६,०००/- इतक्या निधीची भर घालणारी नमो शेतकरी महासन्मान निधी ही योजना राबविण्यास संदर्भ क्र.३ येथील दि.१५.०६.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. राज्यात नमो शेतकरी महासन्मान निधी योजनेंतर्गत लाभार्थ्यांना अनुदान वितरित करण्यासाठी राज्य शासनाच्या महाडीबीटी पोर्टलवर स्वतंत्र आज्ञावली विकसित करुन तसेच नवीन बँक खाते उघडून सदर योजना सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन या प्रणालीद्वारे राबविण्यात येणार आहे.

२. आयुक्त (कृषि) यांनी संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये केलेल्या विनंतीस अनुसरुन, राज्यात नमो शेतकरी महासन्मान निधी योजनेंतर्गत लाभार्थ्यांना अनुदान वितरित करण्यासाठी एक व राज्यस्तरावर स्थापन करण्यात येणाऱ्या राज्य प्रकल्प संनियंत्रण कक्षाच्या प्रशासकीय खर्चासाठी एक अशी एकूण दोन स्वतंत्र बचत खाती आयुक्त (कृषि) यांचे नावे राष्ट्रीयकृत बँकेत उघडण्यासाठी परवानगी देणेबाबत तसेच सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीद्वारे सदर योजना राबविताना येणाऱ्या विविध अडचणी विचारात घेऊन सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीमधील मेकर, सहायक चेकर तसेच चेकरची भूमिका सोपविण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यास अनुसरुन शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः-**

राज्यात नमो शेतकरी महासन्मान निधी योजनेंतर्गत लाभार्थ्यांना अनुदान वितरित करण्यासाठी एक व राज्यस्तरावर स्थापन करण्यात येणाऱ्या राज्य प्रकल्प संनियंत्रण कक्षाच्या प्रशासकीय खर्चासाठी एक अशी एकूण दोन स्वतंत्र बचत खाती “बँक ऑफ महाराष्ट्र” या राष्ट्रीयकृत बँकेत आयुक्त (कृषि) यांचे नावे उघडण्यासाठी शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय या विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दि.२७.०९.२०१७ रोजीच्या शासन निर्णयामधील खालील नमुद अटी व शर्तींच्या अधीन राहून तसेच वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र. १७८/२३/कोषा प्रशा-५, दि.११.०७.२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

(१) “नमो शेतकरी महासन्मान निधी” योजनेंतर्गत लाभार्थ्यांना अनुदान वितरित करण्याकरिता तसेच राज्य प्रकल्प संनियंत्रण कक्षाच्या प्रशाकीय खर्चाकरिता उघडण्यात येणाऱ्या बचत बँक खात्यांचा वापर केवळ त्याच प्रयोजनाकरिता करण्यात यावा.

(२) उक्त बचत बँक खात्यामध्ये जमा करण्यात आलेला आलेला निधी/व्याज तसेच योजनेच्या कामांच्या प्रगतीनुसार लागणाऱ्या निधीचा वेळोवेळी आढावा घेऊन त्याबाबतच अहवाल सादर करावा.

(३) सदर बचत बँक खात्यावरील व्याजाची रक्कम तसेच शिल्लक रक्कम याचा ताळमेळ घेऊन निश्चित होणारी रक्कम शासकीय लेख्यामध्ये जमा करावी.

(४) सदर बँक खात्यात दिर्घकाळ निधी विनावापर पडून राहणार नाही याद्दष्टीने तात्काळ विनियोजनासाठी आवश्यक असेल त्याचवेळी कोषागारातून निधी आहरित करण्यात यावा.

(५) योजना बंद झाल्यास त्या योजनेचे खाते बंद करण्यात यावे. सदरची जबाबदारी आयुक्त स्तरावर आयुक्त (कृषि) यांची असेल.

(६) (अ) सदर खात्यातील व्यवहार फक्त सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीद्वारे होणार असल्याने, ज्यावेळी निधी खर्च करावयाचा असेल त्यावेळी सक्षम अधिकाऱ्याने बँकेच्या नावे निधी वितरणाचे आदेश (Fund Transfer Order) निर्गमित करावेत. त्यासाठी सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर लॉगईन करुन Fund Transfer Order तयार करण्यात यावी. सदर काम मेकरचे असेल.

(ब) सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीद्वारे खात्यातील व्यवहार करण्यासाठी करण्यासाठी कृषि आयुक्तालय, पुणे या कार्यालयातील उपायुक्त (कृषि गणना) हे मेकर (Maker) असतील व सहाय्यक संचालक (लेखा-१) हे सहाय्यक चेकर (Assistant Checker) असतील तसेच आयुक्त (कृषि) हे अंतिम चेकर ( Final Checker) म्हणून जबाबदार असतील.

(७) उपरोक्त (२) प्रमाणे व्यवहार होत असल्याने, कोणत्याही परिस्थितीत चेकबुकचा वापर होणार नाही. त्यामुळे सदर खाते विना चेकबुकचे असल्याबाबत लेखी आदेश सर्व संबंधितांनी त्यांच्या स्तरावरुन बँकेस द्यावेत.

(८) सदर खात्यातून रोख अथवा चेकबुक अथवा विड्रॉवल स्लिप (Withdrawal Slip) या मार्गाने व्यवहार करण्यावर बंदी घालण्यात येत आहे.

(९) आयुक्त (कृषि) स्तरावर आवश्यकतेनुसार विड्रॉवल (Withdrawal) ही सुविधा उपलब्ध असेल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७२८१५४२३१६५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH BANSIRAO KARAD

Digitally signed by SANTOSH BANSIRAO KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=f981d5a9fec2e5d5dc36f39695b5f0e4ff5b340cd5420df7cbaa28990d692e36, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=90BBB9D3E7E74DE43F8070E2A9A65BFD42747F1995A4F22FDC0240939AAB0835, cn=SANTOSH BANSIRAO KARAD
Date: 2023.07.28 15:43:51 +05'30'

**( संतोष कराड )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, पुणे.
४. कृषि सहसंचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक (लेखा व कोषागारे), मुंबई,
६. सहसंचालक (सुधारणा ) संचालनालय,लेखा व कोषागारे,नवीन प्रशासकीय भवन,५ वा मजला, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
८. महालेखाकार कार्यालय, मुंबई /नागपूर-१/२, महाराष्ट्र.
९. सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी (११-अे ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सहाय्यक संचालक (लेखा-१/२), कृषि आयुक्तालय, पुणे.
११. वित्त विभाग (व्यय-२/अर्थ-१३/कोषा प्रशा-५), मंत्रालय, मुंबई.
१२. लेखाधिकारी (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, पुणे.
१३. उप महाप्रबंधक, डिजिटल आणि लेणदेण बँकींग शासकिय व्यावसायिक विभाग, सायनरजी सी-६/जी ब्लॉक बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, वांद्रे (पूर्व) मुंबई- ४०० ०५१.
१४. सहाय्यक राज्य नोडल अधिकारी, पीएफएमएस, मुंबई.
१५. निवड नस्ती ( कार्यासन २-अे ).